रोजगार व स्वयंरोजगाराचे नवीन
धोरणाची अंमलबजावणी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
शासन निर्णय क्रमांक धोरण-२०००/प्र.क्र.१५८/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय भवन,१४ वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक. ०६ ऑक्टोबर, २०००

संदर्भ : १. रोजगार व स्वयंरोजगार विभाग, शासन निर्णय क्र. धोरण २०००/प्र.क्र.६७/रोस्वरो-१, दिनांक १७ मे २०००.
२. रोजगार व स्वयंरोजगार विभाग, शासन निर्णय क्र.धोरण २०००/प्र क्र ६७/रोस्वरो-१, दिनांक १६ जून २०००
३. गुरुवार दिनांक २४ ऑगस्ट २००० रोजी सहयाद्री अथिती गृह मुंबई येथे झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीचे कार्यवृत्तातील विषय क्रमांक ५.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्यात बेरोजगार ही एक जटील व ज्वलंत समस्या आहे. राज्यातील रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रात आतापर्यन्त सुमारे ४३ लाख बेरोजगारांची नोंद झालेली आहे. मात्र या बेरोजगारीच्या प्रमाणात नोक-यांच्या संखेत वाढत्या औद्योगिकरणामुळे तसेच संगणकीकरण यामुळे घट होत आहे. ही स्थिती यापुढेही राहण्याची शक्यता आहे. हा बेरोजगारीचा जटील प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने मा.मुख्यमंत्री महोदयांनी रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या कामकाजाचा आढावा घेतला असता शासनाचे स्वयंरोजगाराचे निश्चित धोरण असावे असे निदर्शनास आले. ही बाब विचारात घेवून राज्याच्या स्वयंरोजगाराचे घोरणाचा मसूदा मंत्रीमंडळाच्या दिनांक २६ एप्रिल २००० च्या बैठकीत सादर करण्यात आला होता. या धोरणावर मंत्री मंडळाच्या बैठकीत चर्चा होवून स्वयंरोजगाराचे धोरण ठरविण्यासाठी मोठयाप्रमाणावर चर्चा व सखोल अभ्यास करण्याची आवश्यकता बैठकीत प्रतिपादन करण्यात आली व त्यासाठी मंत्री मंडळाच्या उपसमितीची स्थापना दिनांक १७ मे, २००० च्या शासन निर्णयाने करण्यात आली.

मंत्रीमंडळ उपसमितीने एकूण ६ बैठका घेवून सदर बैठकांसाठी संबंधित मंत्रालयीन विभागाचे विभाग प्रमुख, महत्वाच्या बँकांचे महाव्यवस्थापक तसेच महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स व इंडस्ट्रिज यांचे प्रतिनिधी सोबत विविध विषयावर चर्चा करुन रोजगार व स्वयंरोजगारा संबंधीचे धोरणाचा अहवाल दिनांक २४ ऑगस्ट, २००० च्या मंत्री मंडळाच्या बैठकीसमोर ठेवला. सदर अहवाल व त्यातील सर्व शिफारशींना या बैठकीत मान्यता देण्यात आली.

**शासन निर्णय**

मंत्रीमंडळ उपसमितीने दिलेला रोजगार व स्वयंरोजगाराच्या धोरणाचा अहवाल आणि मंत्री मंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने राज्यातील प्रत्येक बेरोजगारास स्वयंरोजगार करणेसाठी पात्र करणे, त्याची क्षमता वाढविणे व त्यास स्वयंरोजगारक्षम करण्याचे धोरण शासनाने निश्चित केले आहे. यासाठी सद्या चालू असलेल्या योजनांचे पुनर्विलोकन करणे, लाभार्थ्यांची निवड व योजनांची प्रभाविपणे अमंलबजावणी करणे, व्यवसायांची आखणी स्थानिक परिस्थिती व मागणी प्रमाणे करणे, या कार्यक्रमामध्ये स्वयंसेवी संस्थांचा सहभाग करुन घेणे, आवश्यकते प्रमाणे शिक्षणाच्या धोरणात बदल करणे, स्वयंरोजगारासाठी पणन (मार्केटींग) ची प्रभावी यंत्रणा निर्माण करणे/व्यवस्था करणे, स्वयंरोजगारासाठी पतपुरवठा सुलभ रितीने उपलब्ध करणे तसेच स्वयंरोजगारासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड केली जाईल या दृष्टीने उपाय योजना करणे, महिलांसाठी स्वयंरोजगाराचे विशेष कार्यक्रम राबविणे व यामध्ये त्यांचा सहभाग वाढविणे, स्वयंरोजगार अवलंबिणा-या लाभार्थ्यास आर्थिक स्थैर्य प्राप्त व्हावे यासाठी विभा योजनेच्या तत्वावर

विशेष योजना तयार करणे बाबतचा निर्णय शासनाने घेतला आहे. याबाबत मंत्रीमंडळाने घेतलेले निर्णय व त्याबाबत करावयाची कार्यवाही याचा सविस्तर तपशील यासोबत परिशिष्ठ- अ मध्ये जोडला आहे.

२ रोजगार व स्वयंरोजगारोचे नवीन धोरणाची अंमलबजावणीचा भाग म्हणून सद्या अस्तित्वात असलेली रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे ही स्वयंरोजगाराचे मार्गदर्शन तसेच लाभार्थ्यांना योग्य ते सहाय्य देणारी केंद्रे बनविण्यात यावीत. याकरीता विशेष अहर्ताप्राप्त व योग्य क्षमता असणारे मनुष्यबळ विभागाने त्यांच्या सद्याच्या मनुष्यबळात बचत करुन घ्यावे. तसेच रोजगार व स्वयंरोजगार विभागातील व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अधिका-यांना बदलत्या क्षेत्राबद्दल किंवा भूमिकेबद्दलचे प्रशिक्षण देण्यात यावे.

३ रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे ही खाजगी संस्थेप्रमाणे पाठवणी यंत्रणा (प्लेसमेंट एजंसी) करण्यात येईल.

४ ग्रामीण भागातील मजूरांसाठी रोजगार हमी योजना राबवून शासनाने आवश्यक तो निधी देण्याचे उत्तरदायीत्व स्विकारले आहे त्याचप्रमाणे सुशिक्षित बेरोजगारांच्या बाबतीत आवश्यक तो निधी स्वयंरोजगार योजने प्रीत्यर्थ देण्याची जबाबदारी शासनाने स्विकारावी

५ रोजगार व स्वयंरोजगार विभागास समन्वयकाची भूमिका पारपाडणे, आवश्यक अभ्यासक्रम सुरु करणे इत्यादी करीता दरवर्षी किमान रुपये ५० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात यावा.

६ रोजगार व स्वयंरोजगार विभागाने सर्व कालबाह्य अभ्यासक्रम रद्द करण्याचे तसेच जिल्हा स्तरावर सर्व शासकीय प्रशिक्षण संस्थांमार्फत अल्पमुदतीचे व्यवसायाशी सांगड घातलेले अभ्यासक्रम घेण्याचे कार्य करावे.

या धोरणाची अंमलबजावणी सर्व संबंधित विभागांनी तात्काळ सुरु करावयाची आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भू. प्र. पाण्डेय)
सचिव,
रोजगार व स्वयंरोजगार, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. उप मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
मा. सर्व मंत्री /राज्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव
मा. सल्लागार, रोजगार व स्वयंरोजगार
मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये (विभागामार्फत)
व्यवस्थापकीय संचालक, सर्व शासकीय, निमशासकीय महामंडळे
सर्व स्थानिक स्वराज्य संस्था
महालेखापाल, महाराष्ट्र-१ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ लेखा व अनुज्ञेयता, नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

सर्व अधिदान व लेखा जिल्हा कार्यालये
निवासी लेखापरीक्षण अधिकारी,
संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य, कोकणभवन नवी मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र
निवड नस्ती

**परिशिष्ट -१**

| अ.क्र. | शिफारस क्र. | शिफारस तपशिल | कार्यवाहीचा विभाग व कार्यवाहीचा तपशिल | कालमर्यादा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | २ | अ) सर्व योजनांचे सर्वेक्षण किंवा पुनर्विलोकन वस्तुनिष्ट पध्दतीने एका स्वतंत्र संस्थेमार्फत करण्यात यावे व त्याचा अहवाल सहा महिन्यात प्राप्त व्हावा. त्यानंतर दोन वर्षांनी अशा प्रकारचे स्वतंत्र संस्थेमार्फत पुनर्विलोकन करण्यात यावे. | रोजगार व स्वयंरोजगाराच्या योजना राबविणारे सर्व मंत्रालयीन विभाग.-- सध्या राबविण्यात येत असलेली योजना किफायतशीर आहे कां, त्यामधून रोजगार निर्मितीस वाव आहे काय, लाभार्थी स्वयंपूर्ण होतो काय, योजनेमध्ये कांही बदल करण्याची आवश्यकता आहे काय, इत्यादीबाबत वस्तुनिष्ट सर्वेक्षण स्वतंत्र संस्थेमार्फत करण्यात यावे. सर्वेक्षणाच्या शिफारशीवर आधारित योग्य ते बदल करण्यात यावेत. | प्रथम सर्वेक्षण सहा महिन्यात पूर्ण करावे. त्यानंतर दर दोन वर्षांनी. |
| | | ब) या अहवालाची अंमलबजावणी होत आहे याचा आढावा सचिवांचे त्रिसदस्य समितीने सातत्याने घ्यावा. | रोजगार व स्वयंरोजगार विभागाने प्रथम त्रिसदस्य सचिव समितीची नियुक्ती करावी व त्यानंतर सदर समिती याबाबत कार्यवाही करेल. | तात्काळ |
| | | क) वर उल्लेखिलेल्या दोन बाबीं व्यतिरिक्त प्रत्येक विभागाने त्यांचे अधिपत्त्याखालील योजनांचा आढावा घेवून तो अहवाल विभागाचे मा. मंत्री महोदयांस एक महिन्याच्या आत सादर करावा. विभागाने आढावा घेतांना समितीच्या शिफारशींचा विचार करुन योजनांचे पुनर्विलोकन करावे. | सर्व संबंधित विभाग | एक महिना |
| २ | ३ | लाभार्थ्यांची निवड व योजनांची अंमलबजावणी-- लाभार्थ्यांची निवड ही शास्त्रोक्त पध्दतीने होत नाही, केवळ इष्टांकपूर्ती करिता होत आहे. याचा अनिष्ट परिणाम योजनेच्या यशस्वीतेवर होत आहे. तेव्हा लाभार्थ्याची निवड करतेवेळी त्याची मानसिकता व कौटुंबिक पार्श्वभूमी लक्षात घेवून तसेच स्वयंरोजगार अवलंबिण्यास अनुकूल आहे किंवा नाही याची तपासणी करुन एका समितीमार्फत व्हावी. याबाबत रोजगार व | १) सर्व संबंधित विभाग<br>२) रोजगार व स्वयंरोजगार विभाग- लाभार्थ्यांच्या निवडीची कार्यपध्दती आखून ती सर्व संबंधित विभागांना देणे. | तात्काळ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | स्वयंरोजगार विभागाने एक कार्यपध्दती आखून द्यावी. ही पध्दत सर्व विभागांनी अंमलात आणावी. | | |
| ३ | ४ | व्यवसायांची आखणी, स्थानिक परिस्थिती व मागणीप्रमाणे असावी--<br>स्वयंरोजगार यशस्वी न होण्याचे एक महत्वाचे कारण म्हणजे अयोग्य व्यवसायाची निवड, त्याचा परिणाम कर्ज परतफेडीवर होतो व योजना अयशस्वी ठरते. यासाठी व्यवसायाची निवड ही स्थानिक गरजेप्रमाणे असणे आवश्यक आहे. याकरिता, | सर्व संबंधित विभाग | तात्काळ |
| | | १) दोन वर्षापूर्वी कोल्हापूर जिल्ह्यात उद्योग व्यवसायांचे गांवनिहाय सर्वेक्षण करण्यात आले होते. त्याचप्रमाणे सर्व जिल्ह्यात गांवनिहाय सर्वेक्षण व्हावे. | महसूल व वन विभाग/ सर्व जिल्हाधिकारी | |
| | | २)व्यवसायाची निवड ही स्थानिक गरजेप्रमाणे असावी. विभागामार्फत कोणत्याही प्रकारचे बंधन असू नये. | सर्व संबंधित विभाग | |
| | | ३)योजनांची अंमलबजावणी इष्टांकाप्रमाणे करण्याऐवजी जिल्ह्यीील गांवांच्या समुहावर (क्लस्टर ॲप्रोच) करावी. | सर्व संबंधित विभाग | |
| ४ | ६ | स्वयंरोजगाराच्या योजना जास्तीत जास्त लाभार्थ्यांपर्यन्त प्रभावीरीत्या पोहोचविण्यासाठी व शासकीय यंत्रणेतील ताण कामी करण्यासाठी स्वयंसेवी संस्थांचा सहभाग हा प्रत्येक योजनेत शासनाने करुन घ्यावा. | सर्व संबंधित विभाग | तात्काळ |
| | | २) ज्या बँका / स्वयंसेवी संस्था / ट्रस्ट स्वतः रोजगार स्वयंरोजगार निर्मितीचा कार्यक्रम घेऊ इच्छितात त्यांना शासनाने संपूर्ण पाठींबा द्यावा. | सर्व संबंधित विभाग | |
| | | ३) ज्या संस्था शासकीय कार्यक्रमाच्या अंतर्गत अभ्यासक्रम चालवितील त्यांना शासनामार्फत प्रत्येक लाभार्थ्याप्रीत्यर्थ अर्थसहाय्य देण्याची योजना आखण्यात यावी. प्रत्येक जिल्ह्यात स्वयंसेवी संस्थांचे फेडरेशन करावे जे शासनाशी समन्वय ठेवील. | रोजगार व स्वयंरोजगार विभाग. | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| ५ | ७ | शिक्षणासंबंधीचे धोरण-<br>महाराष्ट्रात तंत्रज्ञान व व्यावसायिक शिक्षण देणा-या शासकीय व खाजगी संस्थांची क्षमता दरवर्षी अडीच लाख प्रशिक्षणार्थी एवढी आहे. सध्याच्या बेरोजगारांची संख्या लक्षात घेता तंत्रज्ञान व व्यावसायिक शिक्षण देणा-या संस्थांच्या संख्येच्या क्षमतेत वाढ होणे आवश्यक आहे. त्यासाठी | | तात्काळ |
| | | १) तंत्रज्ञानाचे दिले जाणारे शिक्षण हे बदलणा-या तंत्रज्ञानाशी सुसंगत रहावे या करिता उद्योग धंद्यातील प्रतिनिधी संस्थांच्या सल्ल्याने अभ्यासक्रमाचा सातत्याने आढावा घेवून त्यात योग्य ते बदल करण्यात यावेत. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | |
| | | २) वर उल्लेखिल्याप्रमाणे विविध क्षेत्रातील अभ्यासक्रमांचा सातत्याने आढावा होत आहे कि नाही यावर नियंत्रण ठेवण्यासाठी एक स्थायी समिती नेमावी.<br><br>ज्यात चेंबर्स ऑफ कॉमर्स अॅण्ड इंडस्ट्रीज, उद्योग व्यापा-यांचे इतर प्रतिनिधी संस्था, वित्तीय संस्था, स्वयंसेवी संस्था यांचे प्रतिनिधी व शिक्षण तंज्ञ असावेत. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | |
| | | ३)व्यवसायीक शिक्षण हा शालेय शिक्षणाचा अविभाज्य भाग रहावा असा अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर एसएससी (व्यावसायिक शिक्षण) झाल्याचे प्रमाणपत्र देण्यात यावे. | शालेय शिक्षण विभाग | |
| | | ४) सध्या कार्य करीत असलेल्या खाजगी संस्थांच्या क्षमतेत वाढ करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन द्यावे. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग व शालेय शिक्षण विभाग | |
| | | ५) उद्योगधंद्यांच्या प्रातिनिधीक संस्थांना प्रशिक्षण व तांत्रिक शिक्षण देण्यासाठी प्रोत्साहित करावे. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग व शालेय शिक्षण विभाग. | |
| | | ६) व्यवसायिक व तंत्रज्ञान शिक्षण हे बहुविध कौशल्याचे (मल्टीस्कील्ड) असावे. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | |
| | | ७) लाभार्थ्यांची दृष्टी शोधक बनविण्याकरिता त्यांना योग्य ते प्रशिक्षण द्यावे. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| ६ | ८ | पणन (मार्केटींग)-<br>स्वयंरोजगारामार्फत निर्माण होणा-या उत्पादित मालाची विक्री व सेवा याची यशस्वीता योग्य बाजारपेठ मिळण्यावर अवलंबून आहे. यासाठी-<br>१) शासन / शासकीय अंगिकृत व्यवसाय, स्थानिक स्वराज्य संस्था यांनी स्वयंरोजगार करणा-या व्यक्ती, संस्था व महिलांचे गट त्यांचे मालाचे विक्रीकरिता योग्य जागा किंवा सुविधा मिळवून देणे. | ग्रामविकास/ नगरविकास विभाग/ सर्व संबंधित शासकीय / निमशासकीय विभाग व स्थानिक स्वराज्य संस्था इत्यादी. | तात्काळ |
| | | २) उत्पादीत मालास मार्केट उपलब्ध आहे किंवा नाही हे अजमावण्यासाठी शोधक वृत्ती बनवावी किंवा मार्केटींगचे ज्ञान हा एक प्रशिक्षणाचा भाग असावा. | स्वयंरोजगार प्रशिक्षण देणारे सर्व संबंधित विभाग. | |
| | | ३) पणन संबंधीचे अभ्यासक्रम विविध क्षेत्रात सुरू करण्यात यावेत. | वरीलप्रमाणे | |
| | | ४) नगरविकास आराखडा तयार करतांना किरकोळ प्रकारच्या स्वयंरोजगार निर्मितीच्या छोट्या व्यवसायाकरिता जमिनी / जागा आरक्षित करण्यात यावी. | नगरविकास विभाग | |
| | | ५) राज्याच्या शहरी भागात रहिवाशांच्या सोईकरिता व दैनंदिन जीवनात मदत करण्याकरिता सेवा सोसायटी स्थापन कराव्यात. | रोजगार व स्वयंरोजगार विभाग / सहकार विभाग | |
| | | ६) स्थानिक स्वराज्य संस्थांच्या दैनंदिन कार्याकरिता लागणा-या मालाचा पुरवठा व सेवांची आवश्यकता विचारात घेवून त्यापैकी कांही बाबी स्वयंरोजगार उद्योजकाकरिता आरक्षित करण्यात याव्यात. | ग्रामविकास विभाग<br>नगरविकास विभाग | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| ७ | ९ | पत पुरवठा आणि कर्ज परतफेड-<br>लाभार्थ्यांचा स्वयंरोजगार यशस्वी झाल्यामुळे वित्तीय संस्थांच्या कर्जाची परतफेड होत नसल्यामुळे किंवा अपुरा पतपुरवठा यामुळे बँका अडचणीत येतात. यासाठी -<br>१)जिल्हास्तरावर प्रोजेक्टनिहाय किंवा व्यवसायनिहाय योग्य पतपुरवठ्याचा निश्चित अंदाज बांधण्यात यावा याचा आढावा जिल्ह्यात जिल्हाधिकारी, लीड बँक, इतर बँका व स्वयंसेवी संस्थांच्या समवेत दरमहिन्याला घ्यावा व थकबाकी वसुलीबाबत कारवाई करावी.<br>२) मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली बँकांच्या अध्यक्षांची समिती असावी, ज्यात जिल्ह्यांचे दत्तक कार्यक्रमांचा आढावा घ्यावा. | सर्व संबंधित विभाग / जिल्हाधिकारी<br><br>नियोजन विभाग / वित्त विभाग /रोजगार व स्वयंरोजगार विभाग | तात्काळ |
| ८ | १० | महिलांसाठी स्वयंरोजगाराचा कार्यक्रम-<br><br>१) महिलांसाठी प्रचलित योजनांमधून विशेष कार्यक्रम तयार करुन प्रभावीपणे राबविण्यात यावेत. याकरिता महिलांसाठी योग्य असे वर्धनक्षम (व्हायबल) व्यवसायांची यादी तयार करावी. शासन अंगिकृत व्यवसाय तसेच स्थानिक स्वराज्य संस्था यांना आवश्यक असणा-या वस्तूंचा व मालाचा पुरवठा महिला गटांचेमार्फत घेण्यासाठी निदेश देण्यात यावेत.<br><br>२)इन्फोरमेशन टेक्नॉलॉजीमधील संधी महिलांना उपलब्ध करुन द्याव्यात. | सदरची योजना महिला व बालकल्याण विभागाने रोजगार व स्वयंरोजगार विभागाशी सल्ला मसलत करुन निश्चित करावी. | तात्काळ |
| ९ | ११ | रोजगार व स्वयंरोजगाराची नवी क्षितिजे -<br>१) संघटित क्षेत्रात मनुष्यबळ निर्मिती म्हणजे रोजगाराच्या संधी, आर्थिक प्रगतिच्या प्रमाणात उपलब्ध झाल्या नाहीत याची कारणे शोधून त्यावर तोडगा काढण्यात यावा. संघटित क्षेत्रात विकासाची जी अहमहिका लागलेली आहे, त्यामध्ये भांडवली गुंतवणूकीवर जास्त भर देण्यात येतो, मनुष्यबळाचा वापर मोठ्या प्रमाणावर घडवून आणावयाची प्रवृत्ती कमी झाली आहे. त्या कारणांची मिमांसा करुन त्यातील अडचणी दूर | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग. | तात्काळ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | करुन ज्यादा ''मनुष्यबळ वापर प्रधान'' उद्योग धंद्यांना प्रोत्साहित करण्यात यावे.<br>२)प्रचलित कामगार विषयक कायद्यामध्ये कामगारांच्या हिताची जपणूक होत आहे परंतू त्याचबरोबर कायद्याची चौकट व निर्गमन (एक्झिट) धोरणाच्या अभावामुळे ज्यादा मनुष्यबळाच्या वापर करण्याच्या प्रवृत्तीस पोषक वातावरण निर्माण होत नाही याची जाणीव ठेवून संघटित व असंघटीत क्षेत्रात रोजगाराच्या संधी मोठ्या प्रमाणात उपलब्ध करुन देण्याचे धोरण राबविण्याचे शासनाने ठरविले आहे. याकरिता वरील बाबींचा विचार करुन चेंबर ऑफ कॉमर्स व इंडस्ट्रीज यांचे प्रतिनिधी, कामगारांचे प्रतिनिधी व इतर तज्ञ यांच्याशी सल्ला मसलत करुन औद्योगिक व कामगार विषयक कायद्यामध्ये तसेच धोरणामध्ये योग्य ते बदल घडवून आणावावेत.<br>३) शासनाच्या सध्या प्रचलित असलेल्या योजनांमध्ये मोठ्या प्रमाणात सुधारणा करण्याची गरज आहे. ही सुधारणा करतांना बदलत्या आर्थिक व्यवस्थेमुळे निर्माण होणा-या व्यवसाय व स्वयंरोजगाराच्या नवीन संधींची दखल घेवून पारंपारीक उद्योग / व्यवसायात योग्य तो बदल करण्यात यावा.<br>४) प्रत्येक विभागाने आपल्या अधिपत्त्याखालील रोजगार व स्वयंरोजगाराशी निगडीत योजनांचे पुनर्विलोकन करावे व त्यातील योजना व तद्नुषंगीक व्यवसाय यामध्ये बदलत्या परिस्थितीत आवश्यक ते बदल करावेत. | वरील प्रमाणे<br>सर्व संबंधित विभाग<br>वरीलप्रमाणे | |
| १० | १४ | स्वयंरोजगार अवलंबिणा-यास आर्थिक स्थैर्य-<br>१) स्वयंरोजगार अवलंबिणा-या व्यक्तिस भविष्यात त्याच्या वृध्दापकाळी किंवा धंदा बंद पडल्यास आर्थिक स्थैर्य प्राप्त होत नाही. समाजात स्वयंरोजगार अंगिकारण्यात मानसिक बदल घडवून आणावयाचा असेल तर आर्थिक स्थैर्याची शाश्वती मिळवून देणे आवश्यक आहे. याकरिता विमा योजनेच्या तत्वावर आधारित विशेष योजना रोजगार व स्वयंरोजगार विभागाने तयार करावी. | रोजगार व स्वयंरोजगार विभाग. | |
| ११ | १५ | रोजगार व स्वयंरोजगार विभागाची बदलती भूमिका-<br>स्वयंरोजगार हे धोरण सर्व विभागाने अवलंबिण्यात आणणे आवश्यक आहे. स्वयंरोजगार विभागाची एक प्रभावी समन्वयकाची भूमिका बजाविणे आवश्यक आहे, यासाठी -- | | तात्काळ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | १)स्वयंरोजगारासंबंधी सेवायोजन कार्यालये ही स्वयंरोजगाराचे मार्गदर्शन तसेच लाभार्थ्यांना योग्य ते सहाय्य देणारी केंद्र बनविण्यात यावीत. याकरिता विशेष अर्हता प्राप्त व योग्य क्षमता असणारे मनुष्यबळ विभागाने त्यांच्या सध्याच्या मनुष्यबळात बचत करुन घ्यावे. रोजगार व स्वयंरोजगार विभागातील अधिका-यांना बदलत्या क्षेत्राबद्दल किंवा भूमिकेबद्दल प्रशिक्षण देण्यात यावे. | रोजगार व स्वयंरोजगार विभाग | |
| | | २) सेवायोजन कार्यालये ही एक खाजगी संस्थेप्रमाणे प्लेसमेंट एजन्सी होणे आवश्यक आहे. | वरीलप्रमाणे | |
| | | ३) ग्रामीण भागातील मजूरांसाठी ज्याप्रमाणे रोजगार हमी योजना राबवून शासनाने आवश्यक तो निधी देण्याचे उत्तरदायीत्व स्वीकारले आहे त्याचप्रमाणे सुशिक्षित बेरोजगारांच्या बाबतीत आवश्यक तो निधी स्वयंरोजगार योजनांप्रीत्यर्थ देण्याची जबाबदारी शासनाने उचलणे आवश्यक आहे. त्या योजनांतर्गत होणा-या खर्चाचे संनियंत्रण रोजगार व स्वयंरोजगार विभागामार्फत व्हावे. | नियोजन विभाग | |
| | | ४) रोजगार व स्वयंरोजगार विभागास समन्वयकाची भूमिका पार पाडणे, आवश्यक अभ्यासक्रम इत्यादीकरिता दरवर्षी किमान रुपये ५०.०० कोटी निधी उपलब्ध करुन द्यावा. | नियोजन विभाग | |
| | | ५) रोजगार व स्वयंरोजगार विभागात संगणकीकरणाचे कार्य पूर्ण झाले आहे. त्या विभागाने कालबाह्य अभ्यासक्रम रद्द करण्याचे तसेच जिल्हास्तरावर सर्व शासकीय प्रशिक्षण संस्थांमार्फत अल्प मुदतीचे व्यवसायांशी सांगड घातलेले अभ्यासक्रम घेण्याचे कार्य करावे. | रोजगार व स्वयंरोजगार विभाग | |